श्री रत्न जैन ग्रंथमाला नं. ३

॥ श्री पंचपरमेष्ठिभ्योनमः ॥

अन्य धर्मापेक्षां जैन धर्मांतील

# विशेषता.

अनुवादक

मुनि श्री आनंद ऋषिजी महाराज

---o---

श्रीयुत समीरमलजी कुंदनमलजी
चोरडिया मु. घेला यांच्या आश्रयानें

प्रकाशक

श्री जैन धर्म प्रसारक संस्था
सदर बाजार नागपूर.

| | | |
|---|---|---|
| प्रथमावृत्ति ५००० | वीरसंवत २४५४ सन १९२८ | मूल्य प्रति ८॥ शेंकडा २॥, |

विक्रीचे पैसे पुस्तक प्रकाशित करण्यांत लागतात.

# धन्यवाद.

---

मुक्काम बेळा येथील श्रीयुत कुंदनमलजी चोरडिया यांनीं आपले वडील श्रीयुत समीर मलजी यांच्या स्मरणार्थ आर्थिक सहायता देऊन या पुस्तकास प्रकाशित करून दिले, म्हणून त्या धर्म प्रेमी आणि ज्ञानप्रचारक सज्जनाचा ही संस्था अंतःकरण पूर्वक धन्यवाद देत असतां आभार मानीत आहे.

मंत्री

# प्रस्तावना.

प्रिय बांधवांनो ! आपल्या सेवेंत " **श्री जैन धर्म प्रसारक संस्थेचें** " अन्य धर्मा पेक्षां जैन धर्मांतील विशेषता नामक तिसरें ट्रेक्ट देत असता आम्हांस आनंद वाटतो. श्री आजित कुमारजी शास्त्री संपादक जैन गजट यांनी लिहिलेल्या सत्यार्थदर्पण द्वितीया वृत्तींतील एक अंशरूप हें ट्रेक्ट आहे. आणि श्री जैन पुस्तक प्रकाशक कार्यालय ब्यावर [ राजपुताना ] यथें हिंदी भाषेत प्रकाशित झालें आहे.

ह्या पुस्तकांत जैन धर्माची प्राचीनता, दार्शनिक विशालता, विज्ञानाचा सामना, सत्य प्रतिपादन, साम्यवाद आणि स्वराज्य, अहिंसेवर पूर्ण साम्राज्य या विषयावर निबंध रूपानें मूल लेखकानें चांगलें स्पष्टीकरण केलें आहे, त्यावरून जैन धर्मामध्ये कोणकोणत्या विशेषता आहेत त्या साधारण वाचक वर्गाच्या लक्ष्यांत येतील.

मुनि श्री **आनंद ऋषिजी** महाराजांनी या पुस्तकाचा महाराष्ट्रीय लोकांना लाभ मिळावा या हेतूनें मराठी भाषेंत अनुवाद करून दिला ह्मणून त्यांचा; त्याचप्रमाणें श्री जैन पुस्तक प्रकाशक कार्यालयाचे ऑनरेरी मॅनेजर श्रीमान मोतीलालजी रांका यांच्याकडून मराठी भाषेंत पुस्तक प्रसिद्ध करण्याविषयीं परवानगी मिळाली, ह्मणून त्या कार्यालयाचा, आणि येथील श्री माणिकराव मास्तर यांनीं या पुस्तकास तपासण्याकरितां जी अमूल्य वेळ दिली यास्तव त्यांचा श्री जैन धर्म प्रसारक संस्था धन्यवाद पूर्वक आभार मानीत आहे.

**मंत्री**

ॐ

"सत्यमेव जयते"

# अन्य धर्मापेक्षां जैनधर्मांतील विशेषता

—·—:०:——

प्रिय विज्ञ जिज्ञासु सज्जनांनो ? यद्यपि मागल्या प्रकरणांत आम्हीं जैन धर्माचा संक्षिप्त रीतिनें परिचय लिहिला आहे, तरीही येथें जैन धर्माच्या काहीं एका त्या महत्वशालिनी विशेषतेचें दिग्दर्शन करून देणं आवश्यक समजतों. त्या अन्य धर्मांत आढळत नाहींत. हें दिग्दर्शन दुसऱ्या फायद्या-बरोबर हा एक विशेष फायदा प्राप्त करून देईल कीं "जैन धर्माशीं अन्य धर्मांचा मतभेद कोणत्या कारणानें राहिलेला आहे ? हा विषय आपल्या लक्षांत सरळतेनें येईल." अस्तु.

## या धर्माची प्राचीनता.

जैन धर्म सर्व धर्मापेक्षां पुरातन आहे. कोट्यावधि वर्षांच्या इतिहासास पाहिलें असतांनाही जैनधर्माचा जन्मकाळ मिळत नाहीं. जर अडीच हजार वर्षांपूर्वी बौद्धधर्माच्या उदयकाळाच्या वेळीं पाहिलें तर या धर्माचे अंतिम तीर्थंकर **"श्री महावीर स्वामी"** होते. तसेंच महाभारताच्या वेळीं बावीसावे तीर्थंकर, कृष्णाचे चुलतबंधु, समुद्रविजयजी महाराजांचे पुत्र, **"श्री नेमिनाथ स्वामी"** नीं जैनधर्माचा प्रसार केला होता. याच्याही पलीकडे ज्यावेळीं रामचंद्र लक्ष्मणाचा काळ पाहूं, तरीही विसावे तीर्थंकर **"श्री मुनिसुव्रत स्वामी"** चें शासन मिळेल. याशिवाय "योगवासिष्ठ" वगैरे ग्रंथ त्यावेळीं जैन धर्माच्या अस्तित्वाची साक्ष देतील. प्राचीनतम ग्रंथ ऋग्वेद,

यजुर्वेद देखील जैन तीर्थंकरांची प्राचीनता प्रकाशित करतात. जैन धर्माचे प्रथम तीर्थंकर भगवान् "**श्री ऋषभ देवजी**" ज्यांचें वर्णन भागवत वगैरे ग्रंथांतही आहे. ते वेदांच्या निर्माणकालापासून लक्षावधि वर्षापूर्वी झाले होते. यास्तव जैन धर्म वैदिकधर्मापेक्षांही प्राचीन आहे असें सिद्ध होतें. जर जैन धर्म सर्व धर्मांपेक्षां पुरातन (प्राचीन) आहे, तर तो कोणत्याही धर्माची नक्कल नाहीं, ही गोष्ट देखील स्पष्ट आहे.

## दार्शनिक विशालता

ज्यावेळीं जैनदर्शनाकडे दृष्टिपात केला जातो, त्यावेळीं माहीत पडतें कीं; याच्यासारखें विशाल दर्शन जगांत दुसरें कोणतेंही नाहीं. ज्याप्रमाणें "सर्वे पदा हस्तिपदे निमग्नाः" आहे, म्हणजे मनुष्य, घोडे, बैल, वगैरे सर्व प्राण्यांचे पाय

हत्तीच्या चरण चिन्हांत समावेश होऊन जातात, त्याचप्रमाणें या जैनदर्शनामध्येंही जगांतील सर्व दर्शनांचा समावेश होतो. अद्वैतवाद्यांचें अद्वैत, द्वैतवाद्यांचें द्वैत, ईश्वरवाद्यांचा ईश्वरवाद, अनीश्वरवाद्यांचा अनीश्वरवाद, क्षणिकवाद्यांचा क्षणिक सिद्धांत, तथा नित्य पक्षावलंबी लोकांचें नित्य मत, वगैरे सर्व भिन्न भिन्न प्रामाणिक मतें ह्या एकट्या जैनदर्शनाच्या उदरांत फारच चांगल्या प्रकारें येऊन बसतात. ज्यावेळीं हें जैनदर्शन आपल्या स्याद्वाद-न्यायास बरोबर घेऊन दार्शनिक आखाड्यांत येतें त्यावेळीं अद्वैतवादास सन्मुख उभा पाहून त्यास सांगतें कीं: हे बंधो! जरी सामान्य रीतीनें ह्या जगाचा विचार केला तर वास्तविक हें एकच आहे. यामध्यें द्वैत (द्वित्व) नाहीं जसें- भरतवर्ष देश. ह्या कारणानें या सामान्य अपेक्षेनें जें बोलतोस तें ठीक आहे, किंतु जर तें या

सामान्य अपेक्षेचा हट्ट धरून विशेष अपेक्षेस सोडून देतोस, ती तुझी चूक आहे. पहा ? या जगांत जड आणि चेतन, मुक्त आणि संसारी, वगैरे अनेक प्रकारचे पदार्थ सत्यरूपानें विद्यमान आहेत, यांच्या अपेक्षेनें द्वैत देखील बरोबर सिद्ध होतें.

त्यावेळीं द्वैतवादी पुढें पाहतो, त्यावेळीं विशेष अपेक्षेनें त्याचें मागणें कथंचित ठीक आहे असें मानूनही सामान्य अपेक्षेनें त्यास अद्वैत-वादाची आठवण देऊन त्याच्या एकांत हट्टाची चुकी दाखवितो.

त्यानंतर ईश्वरवादी आपला ईश्वरवाद दाखवून जेव्हां कीं जैनदर्शनापासून प्रशंसेची इच्छा करितो, त्यावेळीं हें ( जैनदर्शन ) त्यास उत्तर देतें कीं पहा ! मोक्षमार्गाच्या अपेक्षेनें तुमचा

ईश्वरवाद कथंचित् सत्य आहे. त्याचें कारण असें आहे कीं, मुक्तिमार्गाचा विधाता ईश्वर अवश्य आहे, परंतु संसारांतील पदार्थांच्या अपेक्षेनें तुमचें मंतव्य (विचार) देखील चुकीचें आहे; कारण कीं जीव, जड (अजीव), प्रकृति, आकाश, काल, सूर्य, चंद्र, पर्वत वगैरे पदार्थ कोणाचे बनविलेले नाहींत, अनादि निधन आहेत.

याचप्रमाणें अनीश्वरवादी जेव्हां आपला अनीश्वरवाद दाखवून आपला सिध्दांत समाप्त करितो, तेव्हां त्यास समाधान (उत्तर) मिळतें कीं, मित्रा ? अनादि निधन पदार्थांच्या अपेक्षेनें तुमचा अनीश्वरवाद ठीक आहे, कारण कीं कोणत्याही ईश्वरानें बनविलें नाहीं. परंतु मोक्षाचा मार्ग तर त्यानें (ईश्वरानें) अवश्य दाखविला आहे. याकरितां ह्या अपेक्षेनें कथंचित ईश्वरवाद ही आहे.

पुढें वाढून ज्यावेळीं बुध्ददर्शनाशीं सामना होतो, त्यावेळीं जैनदर्शन सांगतें कीं प्रियवरा! पदार्थांच्या पर्याया (स्थिती) वर दृष्टि टाकिल्यानें निःसंदेह तुमचें क्षणिकदर्शन सत्य वाटतें, किंतु-त्याच पदार्थांच्या अविनाशी गुणांचा विचार केल्या-नंतर तुमचा क्षणिकवाद असत्यच ठरतो.

बुद्ध दर्शनाशीं झगडणारा ज्यावेळीं नित्य एकांतवादी येऊन आपली कथा ऐकवितो कीं सर्वच पदार्थ नित्य आहेत. त्यावेळीं जैन दर्शन त्यास समजावितें कीं, हे विज्ञा! तूं फक्त पदार्थांच्या अविनश्वर गुणांचाच विचार केला आहेस, याकरितां तुझा असा (नित्यतेचा) हट्ट आहे. ज्यावेळीं तुह्मीं त्या गुणांच्या स्थितीवर दृष्टि टाकाल, तर तुह्मांस माहींत पडेल कीं, गुण नेहमीं एक सारखे राहत नाहींत, प्रतिक्षणीं बदलत

असतात. ह्यामुळें कथंचित् अनित्यवाद राहण्याच्या कारणानें तुमचें दर्शन देखील अधूरें आहे.

याप्रमाणें सगळया जगांतील दर्शनांना निर-निराळ्या अपेक्षेनें सिद्ध करीत असतां अवशिष्ट ( राहिलेला–वांचलेला ) भाग न मानिल्यामुळें त्यांच्या चुका दाखवीत असतां, हें जैन दर्शन न्यायाधीशाचें काम करीत आहे. जैनेतर दर्शनें जेव्हां आपापल्या एकांत मताला घेऊन एक दुसऱ्यास जिंकितात आणि स्वतः हारतात हीं; त्यांवेळीं जैन दर्शन अनेकांत किंवा स्याद्वादमंत-व्याच्या कारणानें सर्वांना युक्तिपूर्वक पराजित करतें. याचें कारण असें आहे कीं, जेथें एक दर्शन समाप्त होतें, तेथें जैन दर्शन त्याच्याही पुढें आपल्या दुसऱ्या अपेक्षेनें सांगण्याचा प्रारंभ करितें. जर बौद्ध दर्शन क्षणिक वादास दाखवित असतां

विश्रांति घेतें, तर जैन दर्शन त्याच्याही पुढं त्यास कथंचित् नित्यतेचा पाठ शिकवितें. ज्याप्रमाणें गारुडी आपल्या झोळ्यांतून तोच पदार्थ काढून दाखवून देतो कीं, ज्या पदार्थास पाहणारा मनुष्य पाहण्याची इच्छा करितो. त्याचप्रमाणें जैन दर्शन प्रत्येक मंतव्य सिद्ध करून देतें की जें पदार्थात मिळतें आणि ज्या ज्या मंतव्यांना निरानिराळीं दर्शनें जाणण्याची इच्छा करितात. याप्रमाणें जैन दर्शन आपल्या विशाल उदरांतून सर्व प्रामाणिक गोष्टींना काढून दाखवून देतें आणि आपल्या असाधारण दार्शनिक विशालतेचा परिचय देतें. ×

## विज्ञानाचा सामना.

जैन धर्मात एक महत्वदायक गोष्ट ही आहे कीं याचे सिद्धांत इतर धार्मिक सिध्दांतांच्या समोर

× विशेष जाणण्याकरितां " स्याद्वादाची सार्थकता " आमच्या येथून मागवा.

विज्ञाना ( सायन्स् ) सारखे कोरडे नाहींत, परंतु प्रत्येक सिद्धांत विज्ञान विचारानें सत्यच ठरतो. पहा ! ह्या जगाविषयीं जैन धर्मानें अनादि निधनता ( ह्मणजे ही सृष्टि केव्हां झाली आणि हिचा नाश केव्हां होणार ? याचा आदि आणि अंत नाहीं ) दाखविली होती. त्यासच विज्ञान आज आविष्कृत ( प्रकट ) करून राहिलें आहे कीं, वास्तविक हें जग अनादि अनंत आहे. यांत उलटापालट प्राकृतिक कारणांनीं स्वयं होत असतें. यांत कोणत्याही ईश्वर वगैरेचा हात नाहीं. वृक्षामध्यें जैन धर्मानें एकेंद्रिय जीव आहे, हें दाखविलें आहे. सायन्सनें त्यासच आतां सिद्ध केलें आहे. अन्यदर्शनांनीं जेव्हां शब्दास आकाशाचा गुण दाखविला, तेव्हां जैन धर्मानें त्यास पुद्गला ( दृश्यमान पदार्था ) चा गुण दाखविला. तदनुसार आकाशांत भरलेले पुद्गल परमाणूंचे

पर्याय ( स्थिति ) रूप शब्द युक्तयांनीं आपल्या न्याय ग्रंथांत सिद्ध करून दाखविलें. त्याच्याच-विषयीं आज सायन्सनें आविष्कार केला आहे कीं; शब्द परमाणूंचीच एक स्थिति आहे. या आधा-रावर त्यानें शब्दांस यंत्रद्वारा धरून टेलीग्राफ वगैरे द्वारा हजारों मैलापर्यंत लांब पोहोंचविण्याची व्यवस्थाही करून दाखविली आहे. प्रकाश आणि अंधकाराविषयीं कोणत्याही दर्शनानें खुलासा केला नाहीं, परंतु जैन धर्मानें याविषयीं स्पष्ट सांगितलें आहे कीं; प्रकाश आणि अंधकार पुद्गल परमा-णूंचीच विशेष स्थिति आहे. सूर्य, दीपक, कंदील, अग्नि वगैरेच्या निमित्तानें त्या परमाणूंत जेव्हां पांढरा रंग येऊन जातो, तेव्हां प्रकाश होतो, ज्या-वेळीं सूर्य वगैरेचें कारण नाहींसे होतें, तेव्हां त्याचा रंग काळा होऊन अंधकार बनवून देतें.

वैज्ञानिक विद्वानांनीं देखील प्रकाश आणि अंधकाराच्या विषयीं असाच निर्णय केलेला आहे. याचप्रमाणें अन्यवैज्ञानिक विषयामध्यें जेव्हां कीं अन्य दर्शनांनीं ईश्वराचें हस्तकौशल ( कामगिरी ) दाखविलें आहे, तेव्हां जैन धर्मानें स्पष्ट सांगितलें आहे कीं, निरंजन निर्विकार ईश्वर ह्या भानगडीपासून सर्वथा वेगळा आहे. हें कार्य एक दुसऱ्या पदार्थांच्या संयोग वियोगापासून स्वाभाविक रीतीनें होत असतें, सायन्स देखील असाच निश्चय करीत आहे. याप्रमाणें विज्ञाना ( सायन्स ) ची जेथपर्यंत पोहोंच आहे, तेथपर्यंत जैन सिद्धांताच्या विरुद्ध त्यानें कोणताच आविष्कार केलेला नाहीं, ह्मणून जैन धर्मास वैज्ञानिक धर्म असें ह्मणूं शकतो. +

---

+ इटालियन विद्वान डॉ० टेसीटोरीचें असें सांगणें आहे कीं जैनदर्शनाचीं मुख्य तत्वें विज्ञान शास्त्राच्या

# सत्य प्रतिपादन.

जैनधर्म अंध परंपरेनें किंवा लकीराचे फकीर होऊन कोणत्याही गोष्टीचा परित्याग किंवा स्वीकार करण्याचा उपदेश देत नाहीं- याचा प्रथम उपदेश हाच आहे कीं, जें कांहीं कार्य कराल, परीक्षा करून हितकारक आणि सत्य असेल तें करा. धर्म धारण करण्याच्या आधीं त्याच्या आंतील अभिप्रायांची तसेंच त्या धर्माचे देव, शास्त्र, गुरूची भरपूर जांच करा त्याच प्रमाणें तो आपले देव, शास्त्र, गुरूंची ही मोकळ्या मैदानांत परीक्षा करविण्याकरितां नेहमीं तत्पर राहतो. याच कारणामुळें त्यानें प्राचीन इतिहासाच्या विषया-

---

आधारावर स्थित आहेत. माझा असा पूर्ण विश्वास आहे कीं जसजशी पदार्थ विज्ञानाची उन्नति होत जाईल, तसतसे जैन धर्माचे सिद्धांत वैज्ञानिक प्रमाणित होत जातील.

मध्येंही परिपूर्ण सत्यतेस प्रगट केलें आहे. इतर शास्त्राप्रमाणें अशा असंभव गोष्टी सांगितल्या नाहींत कीं " आईबापाशिवाय तरुण मनुष्यें उत्पन्न होतात, परमेश्वरानें बाबा आदम आणि हव्वा यांना असेंच बनवून दिलें, रावणाला दहा तोंडें होतीं, तो राक्षस होता, वीरवर हनुमान, सुग्रीव, अंगद वगैरे वानर होते." जैनरामायण आणि महाभारतांत स्पष्ट लिहिलें आहे कीं, रावणास एकच मुख होतें, परंतु तो एक असा हार घालीत होता कीं त्याचीं दहा तोंडें दिसत होतीं. तो विद्याधर मनुष्य होता. त्याच्या वंशाचें नांव राक्षस वंश होतें. हनुमान वीर पवनंजय राजाचा मुलगा होता. सुग्रीव, अंगद वगैरे देखील वीरयोद्ध मनुष्य होते. यांच्या ध्वजेवर वानराचें चिन्ह होतें, वगैरे. जैन शास्त्रांत कोठेंही स्वार्थ साधण्याकरितां तसेंच लोकांना भ्रमजालांत

टाकण्याकरितां असत्य गोष्टींचें प्रतिपादन करून सत्याची अवहेलना केली नाहीं, कारण, जैन ग्रंथकार जैनधर्माच्या उपदेशाप्रमाणें हें लक्षांत ठेवीत होते कीं, खोटें लिहिणें हें फारच मोठें पापकार्य आहे ह्मणून सत्य प्रतिपादनच जैनधर्माची एक विशेषता आहे.

## साम्यवाद आणि स्वराज्य.

जैनेतर प्रायः सर्व धर्मांनीं जीवांच्या अधिकारांना संकुचित करण्यांत अधिकांश भाग घेतला आहे. याच कारणानें त्या धर्मांतील मनुष्यांस अनेक अनधिकार अनुचित कार्य करून टाकण्याचें आणि इतर साधारण प्राण्यांना दाबून ठेविण्याचें विधान करून दिलें आहे; परंतु जैनधर्मानें या संकोच भाव आणि स्वच्छंद निरंकुशतेस घृणेच्या दृष्टीनें पाहिलें आहे. त्यानें सगळ्या जीवांना — ते

जीव मग लहान असोत कीं मोठे असोत, मनुष्य असो कीं पशु, — जीवन स्वतंत्रता सर्वांस समान रूपानें दाखविली आहे. एक बलवान् जीव आपल्या सुखाकरितां दुसऱ्या निर्बल प्राण्यांचें वाटेल तसें करूं शकेल आणि तें त्याचें कार्य धर्म कोटींत येऊन जाईल, असें नाहीं. याच प्रमाणें स्वराज्य प्राप्त करण्याचा अधिकार देखील कोणी एका जीवास दिलेला नाहीं; परंतु जो कोणी जीव त्याच्या करितां प्रयत्न करील, तोच जीव एखाद्या वेळीं स्वराज्या ( संसार समुद्रापासून सुटका, मुक्ति ) स मिळवूं शकेल आणि तें स्वराज्य ह्मणजे मुक्ति देखील त्यास ईश्वरानें दिल्यापासूनच मिळेल, हेंही नाहीं; परंतु त्याचे प्रयत्न सफळ झाल्यानंतर त्यास स्वयं मिळेल, असें स्पष्ट दाखविलें आहे. या कारणामुळें " साम्यवाद आणि स्वराज्य " याचा खरा सिद्धांत

ही जैन धर्मच शिकवितो. ही मुद्दा या धर्माची एक विशेष विशेषता आहे.

## अहिंसेवर पूर्ण साम्राज्य.

आतां आह्मी शेवटीं एक अशा विषयांत उतरतों, ज्यामुळें जैन धर्मानें फक्त भारत वर्षासच काय, परंतु समस्त भूमंडलास आपलें ऋणी बनविलें आहे, तो विषय " अहिंसा " आहे. महानुभावांनो ! अहिंसा परमो धर्मः ह्मणजे अहिंसा एक मुख्य धर्म आहे. या विषयाला घेऊन प्रायः सगळे धर्म उभे झालेले आहेत. कोणताही धर्म अहिंसेला पाप आणि हिंसेला पुण्य सांगत नाहीं, परंतु त्या जैनेतर धर्मांच्या आंतल्या भागाची ज्यावेळीं परीक्षा केली जाते, त्यावेळीं माहीत पडते कीं; त्या धर्मांनीं जीवजातीस देखील ओळखिलें नाहीं आणि पूर्ण रीतिनें अहिंसेचा परिचयही त्यांना झालेला नाहीं. कोणी धर्मानें पक्ष्यांना, कोणी

जळचर ( मासे वगैरे ) जीवांना, तर कोणी वनचरां ( अरण्यांत चरणाऱ्यां ) ना, वास्तविक रीतीनें प्राणधारी मानिलें नाहीं आणि याच कारणामुळें वेळोवेळीं त्यांचे प्राण घेण्यामध्येंही मोकळीक दिलेली आहे. कोणी धर्म आपल्या प्राणरक्षे करितां, कोणी ईश्वराकरितां, कोणी यज्ञा करितां, तर कोणी गुरु पूजे करितां, निरपराधी जीवांचा प्राणघात करण्यामध्यें कांहीं अपराध दाखविला नाहीं. * स्वामी दयानंदजींनीं जरी

* (१) स्वामी दयानंदजी प्रथमावृत्तीच्या सत्यार्थ प्रकाशांतील अकरावा समुल्लास पृष्ठ ३९९ मध्यें सांगतात कीं :--यज्ञाविषयीं तुम्हीं कुतर्क करितां, तो पदार्थ विद्येचें ज्ञान नसल्यामुळें करीत आहांत, कारण कीं तूप, दूध, आणि मांसादिकांचे यथावत् गुण जाणिले असते आणि यज्ञाचा हा उपकार आहे कीं पशूंना मारिल्या-पासून थोडेंसे दुःख होतें परंतु यज्ञामध्यें चराचराचा अत्यंत उपकार होतो. वगैरे.

महीधर, रावण, सायन, वगैरे वेदांचें भाष्य करणाऱ्या आचार्यांना वाटेल तसे अपशब्द ऐकवून

---

(२) प्रथम वेळीं छापलेला सत्यार्थ प्रकाश पृष्ठ ३०३ मध्यें लिहिलें आहे कीं, जेथें जेथें गोमेधादिक लिहिलें आहे, तेथें तेथें पशूंच्या ठिकाणीं मनुष्यांचें मारणें लिहिलें आहे, आणि एका बैलापासून हजारों गाई गर्भ धारण करितात, यानें हानि देखील होत नाहीं, आणि वंध्या गाय असली तर तिला ही गोमेधांत मारणें लिहिलें आहे ; कारण कीं वंध्येपासून दूध आणि वाल्यादिकांची उत्पत्ति होत नाहीं.

(३) प्रथमावृत्तीचा छापलेले सत्यार्थ प्रकाश पृष्ठ ३०२ मध्यें लिहिलें आहे कीं, कोणीही मांस भक्षण केलें नाहीं तर जनावर, पक्षी, मासे आणि जलजंतु जितके आहेत त्यांच्यापेक्षां शंभरपट किंवा हजारपट होऊन जातील, नंतर ते मारूं लागतील आणि शेतांत धान्य सुद्धां होऊं देणार नाहींत. मग सर्व मनुष्यांची आजीविका नष्ट झाल्यामुळें सर्व माणसें मरून जातील.

आपली सत्यवादिता जमविण्याची इच्छा केली, परंतु स्वतः आपणच एके ठिकाणीं नाहीं

---

(४) प्रथमावृत्तीचा छापलेला सत्यार्थ प्रकाश पृष्ठ १०१ मध्यें स्वामीजी लिहितात की; आपल्या इंद्रियांच्या पुष्टीकरितां मांस खाणें आणि पशूंनें मारणें हें राक्षस विधान आहे, आणि यज्ञाकरितां जी पशूंची हिंसा होते, तें विधिपूर्वक मारणं आहे. वगैरे.

(५) पृष्ठ १४० मध्यें मांसाचे पिंड देण्यांत कांहीं पाप नाहीं. पृष्ठ १४१ यांत लिहिलें आहे की वेद आणि ब्राह्मण आणि सर्व पुस्तकामध्यें चार प्रकारचे पदार्थ होम करण्याकरितां लिहिलें आहेत. केशर, कस्तूरी, सुगंधित पदार्थ, खडीसाखर मिष्टपदार्थ, दूध तूप मांसादिक पुष्टकारक पदार्थ आणि चौथा रोगनिवृत्ति-कारक सोमलता वगैरे.

(६) स्वामी दयानंदजींनीं आपल्या यजुर्वेद भाष्य पृष्ठ २०५० मध्यें लिहिलें आहे की, जो या संसारांत पुष्कळ पपुर (कर्पूर) युक्त होम करीत असतां राहिलेल्या

परंतु वीस ठिकाणीं गाय, बकरी वगैरे निरपराध पशूंचा संहार करून यज्ञ करण्याचा, याच प्रमाणें पक्षी, मांस वगैरेस मारून खाण्याचा उपदेश स्पष्ट रीतीनें लिहून गेले आहेत. याप्रमाणें सर्व धर्मांनीं " अहिंसा " धर्माचा अपुरा अर्थ

---

चा भोक्ता वेदविहित आणि सत्यक्रियेचा करणारा मनुष्य असेल, तो प्रशंसेला पात्र होतो वगैरे.

"आर्य,, कोल्हापुरच्या १-७-२६ च्या अंकांत दिगंबराचार्य श्री शांतिसागरजी वर आक्षेप केले आहेत, त्याच्या उत्तरीं मंगलसेनजी जैन, अध्यापक जैन पाठशाला अंबाला छावनी, यांनीं "वास्तविक दयानंदजी कोण होते,, या नांवाचा अग्रलेख स्याद्वाद केसरी जो श्रीधर प्रेस भवानी पेठ सोलापूरहून प्रकाशित होतो, त्याचें वर्ष १ अंक ३८ ता. ५ सप्टेंबर सन् १९२६ मध्यें छापिला आहे. वर लिहिलेलीं प्रमाणें त्याच लेखामधून उध्दृत केलेलीं आहेत. विशेष विवरण किंवा खुलासा मंगलसेनजी यांना विचारावा.

किंवा अनर्थ केला आहे, परंतु जैन धर्मानें या विषयीं पूर्ण विजयश्री मिळविली आहे. त्यानें दया करण्याकरितां कांहीं विशेष जीव निवडून काढिले नाहींत. कांहीं जीवदये-करितां आणि कांहीं आहार संहाराकरितां दाखवून जीवांच्या दोन श्रेण्या केल्या असतील, हें ही नाहीं ; आणि जैनधर्मानें असेंही दाखविलें नाहीं कीं, शेळी, गाय, कबूतर, डुकर वगैरेंची तर रक्षा केली पाहिजे, अन्य प्राण्यांची नाहीं. याप्रमाणें असेंही दाखविलें नाहीं कीं ; आपल्या स्वार्थाकरितां हरिण वगैरेस मारून त्याच्या कातड्यास आसनाकरितां तयार करा: तसेंच स्वाभाविक दुष्टता ठेविणाऱ्या सिंह, सर्प वगैरे जीवांना मारून टाकण्यालाही अहिंसेच्या श्रेणींत ठेविलें नाहीं. परंतु जैनधर्मानें याविषयीं असें स्पष्ट सांगितलें आहे कीं, वाईट भावनेनें

( स्वार्थसिद्धि वगैरेनें ) दुसऱ्या जीवांचे तथा आपलें जें प्राणघात करणें, किंवा मनांस दुःखविणें "ती हिंसा" आहे. याच्या विरुध्द अहिंसा धर्म आहे. त्याप्रमाणें जैनधर्मावलंबी जैन लोक अहिंसा धर्मामध्यें विशेष पुढारी राहतात. ते कोणत्याही कामाकरितां जाणून बुझून ( मुद्दाम ) कोणत्याही निरपराधी जीवास मारीत नाहींत. रात्रिभोजन न करणें, पाणी गाळून पिणें, वगैरे कार्यांचा उद्देश अहिंसा धर्माला सुरक्षित ठेवणें आहे. तो आपल्या अहिंसा धर्माकरितां पशु, पक्षी, जलचर, स्थलचर मुंगी वगैरे क्षुद्र ( लहान ) जंतु पासून हत्ती वगैरे मोठाल्या जीवांना सारखें रक्षण केलें पाहिजे, असें समजतो. याकारणामुळें हे मित्रांनो ! अहिंसेचें खरें साम्राज्य जैनधर्मासच मिळालें आहे.

# अभिप्राय.

श्रीमती एनी बिसेंटनीं मद्रास शहरीं १९०१ च्या डिसेंबर महिन्यांत व्याख्यान दिलें, त्यांत त्या ह्मणतात कीं, एका जिनेश्वरानें जें सांगितलें होतें, तें क्षणभर लक्षपूर्वक ध्यान देऊन ऐका. मी ईश्वरास प्रार्थना करिते कीं संसारांतील सर्व माणसें त्या नियमाप्रमाणेंच जीवनव्यवहारांत वागोत. त्या महान परमेश्वरानें सांगितलें होतें कीं, जेव्हां कोणत्याही वेळीं कोणी मनुष्यानें मला लाकडानें, धनुष्यानें, बुक्यांनीं, मातीच्या ढेकळांनीं किंवा वीटा दगड अथवा खापरांनीं मारिलें, प्रहार केला, दुखापत केली, किंवा सर्वथा ठार मारिलें अथवा धमकी दिली, मरणापासून तर केंस उपटण्यापर्यंत, त्यावेळीं ज्याप्रमाणें मला दुःख आणि वेदना होते, त्याचप्रमाणें विश्वास ठेवा कीं;

सर्व जिवंत प्राण्यांशीं वाईट आचरण केलें जातें, त्यावेळीं सर्व प्रकारचे प्राणी माझ्यासारखेंच दुःख आणि वेदना अनुभवितात. याकरितां सर्व प्रकारच्या जिवंत प्राण्यांना मारूं नये, त्यांच्याशीं क्रूरता दाखवूं नये, त्यांचा दुरुपयोग करूं नये, त्यांना कोणत्याही प्रकारचें दुःख देऊं नये, आणि त्यांचा वध करूं नये. मी सांगते कीं भूत, वर्तमान आणि भविष्य या तिन्हीं काळाचे अरिहंत भगवंत असें सांगतात आणि याप्रमाणें उपदेश करितात कीं, सर्व प्रकारच्या जिवंत प्राण्यांचा वध करूं नका, त्यांचा तिरस्कार करूं नका, त्यांना हैराण करूं नका, सर्व वस्तूंच्या स्वरूपाचें रहस्य जाणणाऱ्या उत्तम ज्ञानधारक महापुरुषांनीं अशा प्रकारचा नित्य, शाश्वत, सनातन, सत्यनियम शिकविला आहे. जर प्रत्येक मनुष्य याप्रमाणें वागेल, तर आर्यावर्त किती विलक्षण होईल? कोणीही तडफड-

तांना दुःख पावतांना, किंवा हैराण होतांना नजरेस देखील येऊं नये.

जेकोस्लावािया राज्याचे एलर्चा डॉ० परटोल्ड यांनीं सन १९२१ ता. २८ आगष्ट च्या दिवशीं खानदेशांतील प्रसिद्ध धुळें शहरीं "धर्माच्या तुलनात्मक शास्त्रांत जैनधर्माचें महत्व" या विषयावर व्याख्यान दिलें होतें. त्यांत अहिंसेची तुलना करीत असतां त्यांनीं सांगितलें कीं:—

"जगांतील सर्व प्राण्याशीं सुखसाधन पूर्वक एके ठिकाणीं कोणत्या प्रकारें राहिलें जाईल ? या प्रश्नासमोर अनेक नीतिशास्त्रांना हात जोडावे लागलेत, अर्थात् या विषयाचा निर्णय देखील कोणाच्यानें हांऊं शकला नाहीं. जैनशास्त्रांत या प्रश्नावर बिलकुल सुलभतेनें आणि पूर्णतेनें विचार केला आहे. दुसऱ्या प्राण्यास दुःख न

देणें किंवा अहिंसा या विषयास जैनशास्त्रांत फक्त तात्विक विधिच न दाखवितां गृहस्थ धर्मा संबंधीं या विषयाच्या आज्ञेपेक्षांही अधिक निश्चयपूर्वक आणि भार देऊन त्यास आचरण करण्यायोग्य आचार दाखविला आहे. ''

महात्मा गांधीजींचें साप्ताहिक पत्र हिंदी नवजीवन ता. २५ मार्च सन १९२३ मध्यें एका सुयोग्य लेखकानें भारत वर्षाच्या परतंत्रतेच्या मुख्य कारणामध्यें भारतीयांचा शुद्ध चारित्राचा अभाव दाखवित असतां, मनुष्य प्रकृति आणि जैनधर्माच्या अहिंसा सिद्धांतावर याप्रमाणें आपली सम्मति प्रकट केली आहे. मी महात्मा " टालस्टाय आणि जैनसिद्धांना '' ची तुलना करून पाहिली. वरून पाहणारांना दोघांच्या सिद्धांतामध्यें पुष्कळ ठिकाणीं सारखेपणा पाहण्यांत येईल.

परंतु सूक्ष्मदृष्टीनें पाहिल्या नंतर हें प्रतीत होईल कीं, जेथें टॉलस्टायाच्या उच्च सिध्दांतांत मनुष्य प्रकृति आणि सांसारिक व्यवहाराची उपेक्षा केली आहे, तेथें जैनशास्त्रांमध्यें मनुष्य प्रकृतीचें अत्यंत सूक्ष्म विश्लेषण करून आपले सिध्दांत स्थिर केले आहेत. आपण अहिंसेला घ्या, टालस्टायाचे अहिंसा सिध्दांत पवित्र तर आहेत, परंतु ते मनुष्यप्रकृतीच्या अध्ययनापासून बिलकुल कोरडे आहेत. जैनशास्त्रांमध्यें अहिंसेवर फारच लिहिलें आहे, परंतु ठिकठिकाणीं मनुष्य प्रकृति आणि व्यवहाराचें स्मरण ठेविलें आहे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें असल्यास टालस्टायच्या अहिंसा सिध्दांतामागें तत्वज्ञान नाहीं आणि जैनधर्माची अहिंसा तत्वज्ञानमयी आहे. मी आपणांस हें खरें सांगून राहिलेलों आहे कीं,

मनुष्यप्रकृतीचें जितकें सूक्ष्म विश्लेषण या ग्रंथां ( जैनग्रंथां ) त मिळेल, तितकें कोठेंच मिळणार नाहीं. तत्वज्ञानाच्या प्रकाशांत आपण कोणत्याही विषयाचें अध्ययन कराल, तेथें त्याचें अंतरंग स्पष्ट दिसून येईल.

यावर " नवजीवनाचे " प्रखर विद्वान् संपादकानें टिप्पण्या दिल्या आहेत. मी जैनधर्माच्या अहिंसा शास्त्रासंबंधीं ज्ञाता होण्याचा दावा तर करूं शकत नाहीं, परंतु इतकें मला माहीत पडते कीं; जर अहिंसा धर्मानें शास्त्राचें स्वरूप कोणत्याही संप्रदायांत धारण केलें असेल तर तें जैनधर्मांतच आहे. आणि त्या काळच्या मनुष्यसमाजांत मिळणाऱ्या निःशक्तपणास लक्षांत घेऊन अहिंसेच्या श्रेष्ठ आदर्शा ( कर्तव्या ) पर्यंत पोहोंचण्याकरितां जैनाचार्यांनीं शिड्या - पायऱ्या बनविल्या आहेत

श्री. "एण्ड्रूज,, साहेब प्रसिद्ध मासिक पत्र " माडर्न रिव्यू " मध्यें असहयोग सिध्दांताचें विवेचन करीत असतां लिहितात कीं:—

(१) त्याच प्राचीन काळापासून चालत आले-ल्या जैनधर्माच्या शिक्षणानें महात्मा गांधीजींच्या विचारास पुष्ट केलें आहे.

(२) महात्माजींनीं जैन शास्त्रांचें अध्ययन केलें आहे, जेथें अहिंसा सिध्दांतास विशेष महत्व दिलें आहे. मी स्वतः त्यांना पाहिलें आहे कीं, ते आपल्या एका भयंकर स्थितींत एका जैनशास्त्राचें अध्ययन दररोज करीत होते.

(३) जैनसिध्दांताचें अध्ययन करून महात्मा-जींनीं जगास त्या अमोघ आत्म बळाचें स्वरूप समजाविलें आहे, ज्यांना तें हेय वाटत होतें.

" वीर " पत्र विजनौर वर्ष पहिलें अंक चौथा पृष्ठ ८९–९० यांमधून घेतलेलीं वाक्यें:–
रा. रा. वासुदेव गोविंद आपटे बी. ए. इंदूर.
जैनधर्मांत अहिंसा तत्वास फारच श्रेष्ठ गणिलें आहे. जैनांनीं अहिंसेला ज्या सीमेपर्यंत पोहोंचविलें आहे, तेथ पर्यंत कोणीच गेले नाहींत. आमच्या हातून जीवहिंसा होऊं नये, याकरितां जैनलोक जितके भितात, तितके बौध्द भीत नाहींत. बौध्दधर्माच्या देशांत मांसाहार दिवसेंदिवस जास्त वाढत आहे. आपण स्वतः हिंसा न करून दुसऱ्यांनीं मारिलेल्या बकरे वगैरेचें मांस खाण्यांत कांहीं हरकत नाहीं, असें सोपें अहिंसातत्व बौध्दांनीं काढिलें होतें.

अनेक धर्मांचे ज्ञाता, साहित्यरत्न, लाला कन्नोमलजी, एम् . ए. सेशन जज, धौलपुर यांनीं

आपला " चारित्रमीमांसा " लेख जो जैन होस्टल मॅगझीन अलाहाबाद नोव्हेंबर सन १९२४ च्या अंकांत छापिला आहे. त्यांत ते ह्मणतात कीं:– हा याच ( जैन ) धर्माचा प्रभाव आहे कीं या धर्मास जितके मानतात, ते सगळे मांसमदिरेचे त्यागी आहेत आणि जीवहिंसेचे विरोधी आहेत. जरी हिंदु धर्मांत मांसमदिरेचे परित्यागी आहेत आणि वैश्यजाती त्यावर आतांपर्यंत आरूढ आहे, परंतु ब्राह्मण, क्षत्रिय आणि शूद्र जातींत या दोन्हीं घृणित पदार्थांचा परित्याग नाहीं. ब्राह्मणा-मध्यें कान्यकुब्ज, सारस्वत, सरयूपारीण वगैरे ब्राह्मण, यांना ( मांसमदिरेला ) मोकळ्या मनानें खातात आणि पितात.

भारतगौरव तिलक, पुरुष शिरोमणि, इति-हासज्ञ, मान्यवर, बाळ गंगाधर टिळकांनीं सांगि-तलें होते कीं:–

(१) श्रीमान महाराज गायकवाडां ( बडोदा नरेशां ) नीं पहिल्या दिवशीं कॉन्फरेंसमध्यें ज्याप्रमाणें सांगितलें होतें, त्याच प्रमाणें " अहिंसा परमो धर्मः " या उदार सिध्दांतानें ब्राह्मण धर्मावर चिरस्मरणीय छाप मारिली आहे. पूर्व-काळीं येथें असंख्य पशुहिंसा होत होती. याचीं प्रमाणें मेघदूत काव्य वगैरे अनेक ग्रंथामधून मिळ-तात. परंतु ब्राह्मण धर्मापासून या घोर हिंसेला काढून टाकण्याचें श्रेय ( पुण्य ) जैन-धर्माच्या हिस्यांत आहे.

(२) ब्राह्मण धर्माला जैनधर्मानेंच अहिंसा धर्म बनविलें.

(३) ब्राह्मण आणि हिंदुधर्मांत जैनधर्माच्याच प्रभावानें मांसभक्षण बंद झालें.

(४) ब्राह्मण धर्मावर जैनधर्मानें जी अक्षुण्ण ( अक्षय ) छाप मारिली आहे, त्याचें यश

जैनधर्माच्याच योग्य आहे. जैनधर्मांत अहिंसेचा सिध्दांत पहिल्यापासून आहे आणि त्या तत्वांस न समजल्यामुळें बौध्दधर्म आपल्या अनुयायी चीनी लोकांच्या स्वरूपांत सर्व भक्षी होऊन गेला आहे.

पं. शिवशंकर मिश्र कलकत्ता यांनीं आपल्या रचिलेल्या " भारताचा धार्मिक इतिहास " नांवाच्या पुस्तकांत लिहिले आहे. ब्राह्मण धर्मावर या ( जैन ) धर्माचा फारच प्रभाव पडला आहे. त्यांना २४ तीर्थंकरा सारखे विष्णूचे २४ अवतार निश्चित करावे लागलेत. यज्ञांत पशूंची आहुति बंद करण्याकरितां परस्वाधीन होऊन " अहिंसा परमो धर्मः " या तत्वास स्वीकारावें लागलें- उपवास वगैरे आणि कष्टकारक व्रतें हिंदूत प्रचलित आहेत त्यापैकीं पुष्कळशें यापासून घेतलीं आहेत.

— [illegible]प्रसादजी संपादक अहिंसाप्रचारक,

अजमेर २ जुलै सन् १९२४ च्या अंकांत "अहिंसा धर्मांत अपूर्व शक्ति आहे" या अग्रलेखांत लिहितात कीं:-

जैनशास्त्रांत एक शब्द आणि अक्षरही असें मिळत नाहीं कीं जें अहिंसेचें प्रतिपादन करीत नसेल. जिवांना मारणें, दुखविणें, बदला घेण्याची भावना, प्रारंभापासून शेवटपर्यंत कोठेंच मिळणार नाहीं. जेथें कांहीं मिळत असेल, तर दयाधर्मच मिळतो. त्याचें हेंच खास कारण आहे कीं, जैन धर्म सर्व धर्मावर जय मिळविलेला धर्म आहे आणि मनुष्याचा खरा धर्म निश्चित होत आहे. मोठमोठ्या तत्ववेत्त्यांनीं आणि विज्ञानी लोकांनीं (सायन्स-कारांनीं) या धर्मास तपासिले आणि ऋषि मुनीश्वरांनीं यावर विचार केला आणि ते सर्वांत श्रेष्ठ समजले. आजकालच्या विद्वानांनीं

यास कसोटीवर कसिलें आणि तो खरा निघाला. वर्तमान काळीं महात्मा गांधी सारख्या महापुरुषांनीं मनुष्यांचीं खरी सेवा करण्याकरितां, तसेंच जननी आणि जन्मभूमीच्या उध्दाराकरितां आणि प्राण्यावर दया करण्याकरितां याच धर्माचा आश्रय घेतला आहे.

यामुळें दुसऱ्या धर्मापेक्षां जैनधर्मांत हा देखील एक महत्वशाली विषय आहे. तात्पर्य असें आहे कीं, जैनधर्माचें सगळें शरीर निर्दोष, जगाचे हित करणाऱ्या पवित्र सिध्दांतांनींच बनलें आहे, याकरितां "विश्वधर्म" किंवा "सार्वधर्म" हा जैनधर्मच म्हणविला जाऊं शकतो.




ॐ शांतिः ! शांतिः !! शांतिः !!!